**सह्याद्री व्याघ्र प्रकल्पातील गावांचे पुनर्वसन अभयारण्याबाहेर करण्यासाठी प्रकल्पग्रस्तांना गावठाण क्षेत्रात विद्युतीकरण व पाणी पुरवठा योजनेच्या कामास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्र. डब्ल्युएलपी ०९१५/ प्र.क्र.२९३/फ-१**

**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**

**दिनांक :- ०६ नोव्हेंबर, २०१५.**

वाचा :- मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), ठाणे यांचे पत्र क्र.कक्ष-४/प्र.मा/५२/सन २०१५-१६ ठाणे. दिनांक २०.०७.२०१५ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

सह्याद्री व्याघ्र प्रकल्पातील मौजे रवंदी, आडोशी, माडोशी, कुसापूर व खिरखिंडी ता. जावळी, जि. सातारा येथील गावांचे मौजे एकसाल, सागाव ता. भिवंडी जि. ठाणे येथील वनक्षेत्रात पुनर्वसनातर्गत करण्यात येणाऱ्या क्षेत्रात विद्युतीकरण व पाणी पुरवठा योजना ह्या अनुक्रमे रु. ३९.८४ लक्ष व रु. ७४.४३ लक्ष च्या कामांना प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सह्याद्री व्याघ्र प्रकल्पातील मौजे रवंदी, आडोशी, माडोशी, कुसापूर व खिरखिंडी ता. जावळी, जि. सातारा येथील गावांचे मौजे एकसाल, सागाव ता. भिवंडी जि. ठाणे येथील वनक्षेत्रात पुनर्वसनातर्गत करण्यात येणाऱ्या क्षेत्रात विद्युतीकरण व पाणी पुरवठा योजना ह्या अनुक्रमे रु. ३९.८४ लक्ष व रु. ७४.४३ लक्ष च्या कामांना प्रशासकीय मान्यता देण्यास सार्वजनिक बांधकाम विभागाने सहमती दर्शविली आहे. विद्युतीकरण अंदाजपत्रकात संड्रीजसाठी ५ टक्के, इरेक्शान ऑन मटेरियलसाठी १० टक्के, ट्रान्सपोर्टेशन ऑन मटेरियलसाठी ५ टक्के, आकस्मिक खर्च ३ टक्के, टी ॲन्ड पी ऑन मटेरियल १.५ टक्के, सुपरव्हिजन चार्जेस १० टक्के, व्याज २.५० टक्के याप्रमाणे तरतुदी करण्यात आल्या आहेत. तसेच पाणीपुरवठा कामाचे अंदाजपत्रक सन २०१३-१४ च्या जिल्हा दरसुचीवर आधारीत असून, पाणी पुरवठा योजनेच्या अंदाजपत्रकात १७.५ टक्के ईटीपी चार्जेसची तरतुद करण्यात आली आहे.

सह्याद्री व्याघ्र प्रकल्पातील मौजे रवंदी, आडोशी, माडोशी, कुसापूर व खिरखिंडी ता. जावळी, जि. सातारा येथील गावांचे मौजे एकसाल, सागाव ता. भिवंडी जि. ठाणे येथील वनक्षेत्रात पुनर्वसनातर्गत करण्यात येणाऱ्या क्षेत्रात विद्युतीकरण व पाणी पुरवठा योजना ह्या अनुक्रमे रु. ३९.८४

लक्ष व रु. ७४.४३ लक्ष रकमेच्या प्रशासकीय कामांना सार्वजनिक बांधकाम विभागाने दिलेल्या सहमतीच्या अधीन राहून, शासनाची प्रशासकीय मान्यता (वित्तीय मान्यता वगळून) देण्यात येत आहे.

हे आदेश शासन निर्णय वित्त विभाग, क्र. विअप्र १०.०८/प्र.क्र.७०/२००८/ विनियम, दिनांक १५ मे, २००९, वित्तीय अधिनियम नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग-पाच नुसार महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिका अंतर्गत प्रदान करण्यात आलेले वित्तिय अधिकार, अ.क्र.१ परिच्छेद क्र.१३४ नुसार विभागास असलेल्या वित्तीय अधिकारानुसार व सार्वजनिक बांधकाम विभाग यांच्या सहमतीने, निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५११०६१७४७१७६०१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prakash Kashinath Mahajan

Digitally signed by Prakash Kashinath Mahajan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Prakash Kashinath Mahajan
Date: 2015.11.06 17:48:34 +05'30'

**( प्रकाश महाजन )**

**सह सचिव ,**

**महसूल व वन विभाग.**

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर,

३. मुख्य वनसंरक्षक (प्रा), ठाणे

४. उपवनसंरक्षक (प्रा), ठाणे वन विभाग, ठाणे.

५. महालोखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपूर

६. सार्वजनिक बांधकाम विभाग(इमारत-३), मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२

७. वित्त विभाग, व्यय-१० कार्यासन, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२

८. नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२

९. फ-२/ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२

१०.कार्यासन फ-१ महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२ (निवडनस्ती).